सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतूद वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीजीटी-२०१७/प्र.क्र. ३७ /का-७अ**
नवीन प्रशासकीय इमारत, ३रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ जुलै, २०१७.

वाचा : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१७
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७
३) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र. बिजीटी -२०१७/प्र.क्र.३७/का-४, दि.२१/०४/२०१७
४) महिला व बाल विकास, शासन निर्णय क्र- मबाआ-२०१७/प्रक्र ८०/का-७, दि २०/४/२०१७
५) महिला व बाल विकास, शासन निर्णय क्र- बीजीटी-२०१७/प्रक्र ३७/का-७, दि ५/५/२०१७
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३०/०६/ २०१७

**प्रस्तावना :-**

महिला व बालविकास विभागामार्फत एकात्मिक बालविकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येते. एकात्मिक बालविकास सेवा योजना (सर्वसाधारण) ही केंद्र पुरस्कृत योजना असून केंद्र व राज्य हिश्श्याचे निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

२. सदर योजनेसाठी सन २०१७-१८ करिता रु.२४३८४१.९८ लाख इतक्या रकमेचा APIP तयार करून आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी सादर केलेला आहे. सदर APIP मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीने (State Empowered Programme Committee) दिनांक ५/०४/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी ठेवण्यात आला होता. त्यास समितीची मान्यता मिळालेली आहे. सदर APIP ला केंद्र शासनाची मान्यता घेण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे.

३. या योजनेसाठी केंद्र शासनाकडून रु.१२८५९.९१ लाख निधी प्राप्त झाला असून सदर निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याबाबत खातरजमा करून घेण्यात आली आहे. तथापि, सन २०१७-१८ साठी अद्याप केंद्र शासनाकडून APIP मंजूर करण्यात आलेला नाही. त्यामुळे केंद्र शासनाकडून कोणत्या घटकासाठी किती तरतूद उपलब्ध करून देण्यात आलेली आहे हे स्पष्ट होत नाही. तथापि, अतिकालिक भत्ता, दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क, कार्यालयीन खर्च, संगणक खर्च, पेट्रोल, तेल व वंगण या बाबींवरील तरतूद वितरीत होणे अत्यंत आवश्यक आहे. अन्यथा मुख्य कार्यालय तसेच प्रकल्पाचे दैनदिन कामकाज होऊ शकणार नाही.त्यामुळे APIP मंजूरीच्या अधीन सदर केंद्र व राज्य हिश्श्याची तरतूद अत्यंत अपरिहार्य असल्याने वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वरील पार्श्वभूमीवर आता सन २०१७-१८ करीता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत लेखाशीर्ष २२३६ १९०९ व २२३६१९१८ अंतर्गत अर्थसंकल्पित निधी सोबत जोडलेल्या "विवरणपत्र-अ" नुसार वितरीत करण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-२ व ६ येथील दिनांक १८ एप्रिल, २०१७ व दिनांक ३० जुन, २०१७ च्या आदेशात नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना , प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. सदर निधी केंद्र शासनाकडून मंजूर APIP च्या प्रमाणात घटकनिहाय खर्च करण्याची दक्षता क्षेत्रीय कार्यालयाने घ्यावी.

४. याबाबत सन २०१७-१८ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात येईल, याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, नवी मुंबई यांनी घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८.४.२०१७ व दि. ३०.६.२०१७ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०७१११११८२४७६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinod Vasant Dalvi

Digitally signed by Vinod Vasant Dalvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=167d8b62a8b227c6708ad19d0236d916621b12266f821ce1ff6d9338075be86b, cn=Vinod Vasant Dalvi
Date: 2017.07.11 11:18:21 +05'30'

( वि.व. दळवी )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त,, एकात्मिक बाल विकास सेवा, नवी मुंबई
३. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर
५. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
८. वित्त विभाग (व्यय-६)(अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, का-७अ

**सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील वितरीत करावयाचा निधी**

## विवरणपत्र- अ.

(रूपये हजारात)

| अ.क | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय अंदाज २०१७-१८ | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| | **२२३६ पोषण आहार** | | | |
| १ | **(०८)(०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) (केंद्र हिस्सा ६० %)** | **२२३६ १९०९** | | |
| | ०३ अतिकालिन भता | | ९०.०० | ९०.०० |
| | ०६ दुरध्वनी, वीज व पणी शुल्क | | २४००.०० | २४००.०० |
| | १३ कार्यालयीन खर्च | | ३०००.०० | ३०००.०० |
| | १७ संगणक खर्च | | १०५०.०० | १०५०.०० |
| | २४ पेट्रोल, तेल व वंगण | | ३३६.०० | ३३६.०० |
| | **एकूण** | | **६८७६.००** | **६८७६.००** |
| | | | | |
| २ | **(०८)(०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च)** | **२२३६ १९१८** | | |
| | ०३ अतिकालिन भता | | ६०.०० | ६०.०० |
| | ०६ दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क | | १६००.०० | १६००.०० |
| | १३ कार्यालयीन खर्च | | २०००.०० | २०००.०० |
| | १७ संगणक खर्च | | ७००.०० | ७००.०० |
| | २४ पेट्रोल, तेल व वंगण | | २२४.०० | २२४.०० |
| | **एकूण** | | **४५८४.००** | **४५८४.००** |

Vinod Vasant Dalvi

Digitally signed by Vinod Vasant Dalvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=167d8b62a8b227c6708ad19d0236d916621b12266f821ce1ff6d9338075be86b, cn=Vinod Vasant Dalvi
Date: 2017.07.11 11:18:36 +05'30'

(वि. व दळवी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन